प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्या शासकीय वाहन क्रमांक MH-०१-AN-१४४९ यांचे दुरूस्ती देयक अदा करणेबाबत .....



**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-पुलदे-२०२०/प्र.क्र.३३/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : १३ मार्च, २०२३.

**संदर्भ :-** प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र.पुलदे/२२९९, दि.२९.०४.२०२२.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र यांचे शासकीय कार्यालयीन वाहन क्र.MH-०१-AN-१४४९ हे नादुरूस्त झाल्याने वेळोवेळी शासनमान्यता प्राप्त मे. प्रगती ऑटोमोबाईल या गॅरेजमधून दुरूस्त करून घेतलेले आहे. त्याबाबत मे. प्रगती ऑटोमोबाईल यांनी सादर केलेले देयक प्रचलित बाजारभावाप्रमाणे वाजवी असल्याबाबत कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार व विकास विभाग़, कळवा, जि. ठाणे यांनी प्रमाणित करून दिले आहे. पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे कार्यालयीन वाहन क्र.MH-०१-AN-१४४९ च्या देखभाल व दुरूस्तीबाबत अकादमीकडून सादर करण्यात आलेल्या देयकांचा तपशील खालीलप्रमाणे असून सदर देयकांवर झालेल्या खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्याची विनंती प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये केली आहे.

| अ क्र | गॅरेजचे नाव | देयक क्र. | दिनांक | रक्कम रू. | देयक कोणाकडून प्रमाणित करण्यात आले आहे. |
|---|---|---|---|---|---|
| १ | मे. प्रगती ऑटोमोबाईल | ४७१ | ०२/०१/२०१८ | ४२,९२०/- | शासकीय औद्यागिक प्रशिक्षण संस्था, मुंबई |
| २ | मे. प्रगती ऑटोमोबाईल | ५३१ | १८/०१/२०१८ | ४०,५९२/- | शासकीय औद्यागिक प्रशिक्षण संस्था, मुंबई |
| ३ | मे. प्रगती ऑटोमोबाईल | ६८६ | १२/०२/२०१८ | ९,५२१/- | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार व विकास विभाग, कळवा, जि. ठाणे. |
| ४ | मे. प्रगती ऑटोमोबाईल | ५१२ | २९/०१/२०२० | ४८,७१३/- | कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार व विकास विभाग, कळवा, जि. ठाणे. |
| **एकूण** | | | | **१,४१,७४६** | |

०३ प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र यांचे शासकीय कार्यालयीन वाहन क्र.MH-०१-AN-१४४९ वाहनाच्या दुरूस्तीवरील खर्च रू. ५०,०००/- पेक्षा जास्त आहे. सदरच्या खर्चास १ वर्षापेक्षा जास्त कालावधी उलटून गेला आहे.यास्तव प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र यांचे शासकीय कार्यालयीन वाहन क्र.MH-०१-AN-१४४९ च्या दुरूस्तीसाठी झालेल्या **रू.१,४१,७४६/- (अक्षरी रू. एक लक्ष एक्केचाळीस हजार सातशे शेहेचाळीस फ़क्त**) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०४. यावर होणारा खर्च मागणी क्र. "झेडडी-२, २२०५-कला व संस्कृती, (००)(१०१) ललीत कला शिक्षण (०७) कला अकादमी (०७) (०१), पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (२२०५ १४६३), १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क.३० /२०१३ / विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग़-पहिला, उपविभाग़-दोन, अ.क्र.१९, नियम क्र.६९ व वित्त विभाग़ शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५ भाग़-पहिला, उपविभाग़-एक, अ.क्र.६ व नियम क्र.४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३१३१३१९५१०५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.13 13:25:13 +05'30'

**(विद्या वाघमारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. अवर सचिव, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
6. निवड नस्ती, सां.का.२.